**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः एमएससी -२००४/ प्र.क.२१(भाग-३)/ फ-२**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: १० जून, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२९.१०.२०१०

२) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग, एमएससी - २००४/ प्र.क.२१/ फ-२ दि.२४.०८.२०११.

३) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग, एमएससी - २००४ / प्र.क.२१/ फ-२ दि.०५.१०.२०११.

४) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग, एमएससी - २००४ / प्र.क.२१ (भाग-३)/ फ-२ दि.०४.०८.२०१५.

**शासन शुध्दीपत्रक :-**

वन विभागाचे संगणकीकरण करणे याअनुषंगाने Mobile व Web आधारित कार्यान्वीत केलेल्या PoR प्रणालीच्या प्रगतीबाबत तसेच या योजनेअंतर्गत PDA खरेदी, PDA चे आयुष्यमान ठरविणे, निर्लेखन पध्दती व तद्अनुषंगीक इतचख्य्ययययण्र गोष्टींच्या अनुषंगाने या विभागामार्फत संदर्भ क्र.४ येथील दि.०४.०८.२०१४ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयात वन विभागाच्या संगणकीकरणासंदर्भात इतर स्त्रोतासह योजनांतर्गत योजनेतून मिळणा-या निधीचा स्त्रोत नमूद केलेला नव्हता. सन २०१५-१६ पासून वनविभागाचे संगणकीकरण याकरिता योजनांतर्गत योजना सुरु केल्याने संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयात सुधारणा करणे आवश्यक होते.

याकरिता, सदर दि.०४.०८.२०१५ रोजीच्या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.१ (क) मध्ये अंशत: सुधारणा करण्यात येत असून त्याऐवजी सदर परिच्छेद खाली सुधारीत केल्याप्रमाणे वाचण्यात यावा :-

**परिच्छेद क्र. १ (क) :-** वन विभागाच्या संगणकीकरणासंबंधित विविध कामे खालील दर्शविलेल्या यंत्रणे / विभागामार्फत प्राधान्याने करण्यात यावीत व त्यासाठी लागणारा निधी संदर्भांकित दि.०५.१०.२०११ च्या शासन निर्णयान्वये रु.२५०७.०० लक्ष मंजूर निधीमधून कॅम्पा, १३ वा वित्त आयोग, माहिती व तंत्रज्ञान विभाग तसेच **योजनांतर्गत** व योजनेत्तरच्या शिर्षामध्ये वेळोवेळी प्राप्त होणा-या अनुदानातून भागविण्यात यावे. त्यानुसार खालील विवरणात नमूद बाबींवर त्या पुढील यंत्रणेमार्फत आवश्यक ती कार्यवाही करण्याचे आदेश देण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | कामाचे विवरण | संबधित यंत्रणा/ विभाग |
|---|---|---|
| 1. | Server Farm Services | राष्ट्रीय सुचना केंद्र/ DIT/वन विभाग |
| 2. | Communication Network | भारत संचार निगम लिमीटेड. |
| 3. | Local Area Network | राष्ट्रीय सुचना केंद्र |
| 4. | Application Development | राष्ट्रीय सुचना केंद्र/केपीएमजी |
| 5. | Procurement of Computer | वनविभाग / राष्ट्रीय सुचना केंद्र |
| 6. | Capacity Building | वनविभाग / राष्ट्रीय सुचना केंद्र |
| 7. | Procurement of GIS Software | वनविभाग |

वरील कामांकरिता NIC व BSNL / MRSAC/ इतर केंद्र किंवा राज्य शासकीय विभाग व उपक्रमांसोबत करार / MOU करण्याचे अधिकार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अध्यक्षतेखालील प्रकल्प व्यवस्थापन घटक समितीस राहिल.

GIS / MIS / Mobile application Outsource करण्याचे अधिकार प्रकल्प व्यवस्थापन घटक समितीस राहिल.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१२१२२८०४६६१९ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.06.12 12:29:51 +05'30'

( द.ल.थोरात )
सह सचिव,
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वन विकास महामंडळ, रॉवेल प्लाझा, कडबी चौक,

नागपूर.

४) महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर

६) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक / मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक/ उपवनसंरक्षक.

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

९) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१२) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२

१३) संचालक, एम.आर.एस.सी.नागपूर.

१४) स्टेट इन्फोर्मेटीक ऑफीसर, नॅशनल इन्फोर्मेटीक सेंटर, ११ वा मजला नविन प्रशासकीय भवन, मंत्रालयसमोर, मुंबई-३२.

१५) व्यवस्थापकीय संचालक, भारत संचार निगम लिमिटेड, मुंबई.

१६) सह संचालक, कोषागार कार्यालय, नागपूर.

१७) राष्ट्रीय सूचना केंद्र, नागपूर.

१८) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव

१९) सचिव (वने), यांचे स्वीय सहायक

२०) वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२१) निवडनस्ती/फ-२ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.